सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता वनतळे/सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६०७९७) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावvि-२०२१/प्र.क्र.१९/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३.०२.२०२२

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.६.४.२०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.२४.६.२०२१
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.४६/०७९७/१०६/२०२०-२१, दि. २८.०६.२०२१
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/अ.स./प्र.क्र.०९/२०२१-२२, दि. ६.८.२०२१
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.४२/०७९७/२२२/२०२१-२२, दि. १.९.२०२१
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सावvि-२०२१/प्र.क्र.१९/फ-११ दि. ६.०९.२०२१.
७) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१.
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. २८.०१.२०२२.

प्रस्तावना -:

वनतळे /सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६ ०७९७) या योजनेंतर्गत चंद्रपूर वनवृत्तातील ब्रम्हपूरी व मध्य चांदा या वन विभागांत एकूण रु. ५८.३० लक्ष रकमेचा प्रस्ताव संदर्भाधिन क्र. ३ येथील पत्रान्वये तसेच वनतळे/सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६ ०७९७) या योजनेंतर्गत कोल्हापूर वनवृत्तातील सांगली वन विभागात दगडी नालाबांध व माती नालाबांध कामाकरिता रू.१४४.४५ लक्ष रकमेचा नविन बाब प्रस्ताव संदर्भाधीन क्र. ५ येथील पत्रान्वये शासनास सादर करण्यात आलेला आहे.

२. वनतळे/सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६ ०७९७) या योजनेंतर्गत सन २०२१-२२ या वर्षात रू. १००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १, २, ७ व ८ चे परिपत्रक व शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी (डिसेंबर, २०२१ पर्यंत) अनिवार्य खर्चाच्या निधी वितरण/खर्चाची मर्यादा ७५ % इतकी विहीत करण्यात आली आहे. मात्र २१-पुरवठा व सामूग्री, २६-जाहिरात व प्रसिध्दी, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर), ३२-अंशदाने व ३३-अर्थसहाय या बाबींसाठी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक राहील. तसेच कार्यक्रम खर्चासाठी ५०% इतक्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. मात्र कार्यक्रम खर्चाची वर्ष अखेरची मर्यादा ६०% इतकीच राहील, असे नमूद केले आहे.

वित्त विभागाच्या दि. २८.०१.२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये राज्याच्या अर्थव्यवस्थेस गती देण्यासाठी आता प्रशासकीय विभागांस भांडवली लेख्यातील कार्यक्रम व अनिवार्य खर्चाच्या बाबींसाठी १०० टक्के निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे असे नमूद केले आहे.

३. शासन निर्णय संदर्भ क्र. ६ अन्वये सदर योजनेंतर्गत ०२- मजूरी या उद्दिष्टांतर्गत १५ टक्के (रु. १२.०० लक्ष) निधी व २१-साहित्य व पुरवठा या उद्दिष्टांतर्गत १० टक्के (रु. २.०० लक्ष) निधी वितरीत करण्यात आलेला आहे. भांडवली लेख्यातील कार्यक्रमांतर्गत वनतळे/सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६ ०७९७) या योजनेचा समावेश होतो. सदर योजनेकरिता अर्थसंकल्पित निधी १००.०० लक्ष असल्याने त्यातील उर्वरित निधी वितरीत करणे आवश्यक आहे. त्यामुळे प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा. नागपूर यांचे संदर्भाधीन क्र. ३ व ५ अन्वये प्रस्तावित केलेल्या कामांसाठी ०२- मजूरी या उद्दिष्टांतर्गत उर्वरित रु. ६८.०० लक्ष निधी व २१-पुरवठा व सामूग्री या उद्दिष्टांतर्गत उर्वरित रु. १८.०० लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात वनतळे/सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६ ०७९७) योजनेकरिता रु.१००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. या योजनेंतर्गत उर्वरित निधी पुढीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | प्रस्ताव | | निधी वितरणास मान्यता | | |
|---|---|---|---|---|---|
| | वनवृत्त | वन विभाग | ०२-मजूरी | २१-पुरवठा व सामुग्री | एकूण |
| १ | कोल्हापूर | सांगली | ३६.३७ | ९.६३ | ४६.०० |
| २ | चंद्रपूर | ब्रम्हपूरी व मध्य चांदा | ३१.६३ | ८.३७ | ४०.०० |

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२१-२२ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२१-२२ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळता केला नसल्याची खात्री करावी.

५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-०७**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**०१ वनीकरण, ७० वन दळणवळण व इमारती, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना,**
**राज्य योजनेंतर्गत योजना (००)(०३) वनतळ्यांचे बांधकाम (४४०६ ०७९७).**
**०२- मजूरी व २१ साहित्य व पुरवठा**

८. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १, २, ७ व ८ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक/शासन निर्णयानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं/६०/व्यय-१० दि. १४.०२.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२३११४७३४६७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda99613688793f8ffb2d4595af5,
2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e4e01ce080, postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a3f1c7dcc5655271c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.02.23 16:17:31 +05'30'

**( रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वन संरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)

८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. निवडनस्ती फ-११.